**न्यायालयीन प्रकरणामध्ये शपथपत्र दाखल करण्यासाठी शासनाने प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यापेक्षा कनिष्ठ अधिकाऱ्याने शपथपत्र दाखल न करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- याचिका १११७/(प्र.क्र.४१४ /२०१७)/आ(तांत्रिक)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: १९ ऑक्टोबर, २०१८

**शासन परिपत्रक:-**

मा. उच्च न्यायालय व मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथे जलसंपदा विभागातील गट क व ड मधील कर्मचाऱ्यांमार्फत दाखल केल्या जाणाऱ्या न्यायालयीन प्रकरणामध्ये प्रधान सचिव, जलसंपदा / सचिव (लाक्षेवि) यांना प्रशासकीय विभागाचे प्रमुख म्हणून प्रतिवादी केले जाते. मात्र सदर कर्मचाऱ्यांचे नियुक्ती प्राधिकारी हे मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता हे असल्याने व बहुतांशी प्रकरणात त्यांच्या स्तरावर झालेल्या कार्यवाहीविरोधात न्यायालयात दाद मागितली जाते. त्यामूळे अशा न्यायालयीन प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही करण्यास संबंधित मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता नियुक्ती प्राधिकारी म्हणून सक्षम आहेत. त्यामुळे अशा न्यायालयीन प्रकरणांमध्ये मा. न्यायाधिकरणात शपथपत्र दाखल करणे व यासंदर्भात वेळोवेळी होणाऱ्या सुनावणीच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्यासाठी संबंधित मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता यांना शासन स्तरावरून सक्षम प्राधिकारी म्हणून प्राधिकृत केले जाते. मात्र, आता यासंदर्भात शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, मा. न्यायालयामध्ये / मा. न्यायाधिकरणामध्ये शपथपत्र दाखल करणे व वेळोवेळी होणाऱ्या सुनावणीच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्यासाठी प्राधिकृत केलेले संबंधित अधिकारी यांच्याकडून दुर्लक्ष केले जाते. तसेच न्यायालयीन प्रकरणाचे गांभीर्य लक्षात न घेता कनिष्ठ अधिकाऱ्यांना शपथपत्र दाखल करण्यासाठी प्राधिकृत केले जाते अथवा तोंडी निदेश दिले जातात.

मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल मूळ अर्ज क्रमांक ४८२/२०१७ (श्री. मोहन रामदास चौधरी विरूद्ध महाराष्ट्र शासन व इतर) या न्यायालयीन प्रकरणामध्ये संबंधित अधीक्षक अभियंता यांना शपथपत्र दाखल करण्यासाठी शासन स्तरावरून प्राधिकृत केले असतानाही त्यांनी त्यांच्यापेक्षा कनिष्ठ अधिकाऱ्यांना शपथपत्र दाखल करण्यासाठी निदेश दिले. सदर कनिष्ठ अधिकाऱ्याकडून प्रतिवादींच्या वतीने मा. न्यायाधिकरणात सादर केलेल्या शपथपत्रामध्ये मूळ अर्ज क्रमांक ७०१/२०१५ प्रकरणी मा. प्रशासकीय न्यायाधिकरणाने सदरहू मूळ अर्ज मान्य केला असताना व सदरहू न्यायनिणर्याची प्रत शपथपत्रात जोडली असताना देखील सदरहू मूळ अर्ज रद्दबातल केल्याचे अनावधानाने नमूद केले गेले. मात्र, सदरहू शपथपत्रामध्ये शपथेवर चूकीचे प्रतिपादन केल्याच्या संदर्भात मा. न्यायाधिकरणाने चूकीची व दिशाभूल करणारी

माहिती दिल्याबद्दल संबंधितांविरुद्ध कारवाई का करू नये याबाबत कारणे दाखवा नोटीस देण्याचे आदेश दिले आहेत. तसेच यासंदर्भात विभागाचे प्रमुख या नात्याने प्रधान सचिव, जलसंपदा यांना प्रतिज्ञापत्र सादर करण्याबाबत आदेशित केले आहे.

वरील पार्श्वभूमीवर असे सूचीत करण्यात येते की, यापुढील काळात न्यायालयीन प्रकरणाचे गांभीर्य लक्षात घेऊन शासन स्तरावरून प्रतिज्ञापत्र सादर करण्यासाठी विशिष्ठ अधिकाऱ्यांना प्राधिकृत केल्यानंतर संबंधित अधिकाऱ्यांनी आपल्यापेक्षा कनिष्ठ अधिकाऱ्याला शपथपत्र दाखल करण्यासाठी पुन्हा प्राधिकृत न करता प्राधिकृत करण्यात आलेल्या अधिकाऱ्यानेच व्यक्तीश: शपथपत्र दाखल करण्याबाबतची कार्यवाही तात्काळ करावी. तसेच न्यायालयीन प्रकरणामध्ये दाखल करावयाच्या शपथपत्रामधील बाबींची कार्यालयात उपलब्ध असणाऱ्या कागदपत्रांच्या आधारे व्यक्तीश: तपासणी करून शपथपत्र बिनचूक असल्याची खात्री देखील करून घ्यावी.

यापुढे न्यायालयीन प्रकरणी शासन आदेशाचे पालन न करता ते निष्काळजीपणे हाताळल्याचे निर्दशनास आल्यास त्याची गंभीर दखल घेऊन जबाबदार अधिकारी / कर्मचारी यांच्याविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई सुरू करण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१०१९१७०३५४५५२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran
Shantaram
Parab

Digitally signed by Kiran Shantaram Parab
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=235425ab45ace1df268fe006b80c5cf93af9396efa01db7b8f3ae405e79ae523, cn=Kiran Shantaram Parab
Date: 2018.10.19 17:07:18 +05'30'

**( कि. शां. परब )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. सर्व मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग
२. जलसंपदा विभागातील सर्व अधीक्षक अभियंता.
३. आ (अतांत्रिक) कार्यासन
४. आ (तांत्रिक) संग्रहार्थ.